**कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर पुरविण्यात येणाऱ्या विविध कृषि निविष्ठांच्या पुरवठयाकरिता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांची एकमेव पुरवठादार संस्था म्हणून नेमणूक करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

शासन शुध्दीपत्रक क्रमांक - सुकृऔ-२०१३/प्र.क्र.६३/११अे

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

**दिनांक : ५ नोव्हेंबर, २०१५**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्र.सीपीएस-१२८४/४८३७/सीआर-१२/५-ए, दि.४.७.१९८४ व १७.९.१९८४

२) शासन निर्णय क्र.सीपीएस-१०९८/१०७९७/प्र.क्र.२४/७-ए, दि.६.१०.१९९८

३) शासन निर्णय क्र.पीकरक्षा १०७९/६६११४/सीआर-६२६/५ ए, दि.९ मे १९८०, दि.१०.६.१९८३, दि.१६.८.१९८३, दि.१७.७.१९९३.

४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. सीपीएस २०१०/प्र.क्र.५८/१७-अे, दि.९.३.२०१०, दि. १७.६.२०१० व दि.३०.७.२०११.

५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. सुकृऔ-२००८/प्र.क्र.३१४/११-अे, दि.३.१२.२००८.

६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. सुकृऔ-२०११/प्र.क्र.३१/११-अे, दि.२२.११.२०११.

७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, यांचे पत्र क्र.कृअ/२०१३/No.१२४८५, दि.२७.२.२०१३

८) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.सीपीएस सुकृऔ/दरनि २०१३-१४/५५/गु.नि.५/२०१३,दि.१७.४.२०१३

९) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. सुकृऔ-२०१३/प्र.क्र.६३/११-अे, दि.७.६.२०१३.

१०) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. सुकृऔ-२०१३/प्र.क्र.६३/११-अे, दि.१०.९.२०१४

**प्रस्तावना -**

कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर पुरविण्यात येणाऱ्या कृषि औजारे, पीक संरक्षण औजारे, विद्युत / डिझेल / पेट्रोकेरोसीन पंपसंच, एचडीपीई पाईप, सुक्ष्म अन्नद्रव्ये, जिप्सम, जैविक खते, जंतुनाशके, रासायनिक खते, जैविक जंतुनाशके, इत्यादी विविध कृषि निविष्ठांचा पुरवठा करण्याकरीता उपरोक्त क्र.९ येथील दि.७.६.२०१३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांची एकमेव पुरवठादार संस्था म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे तर अ.क्र.१० येथील दि.१०.९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये काही निविष्ठांकरीता मार्कफेड यांच्या नावास मान्यता देण्यात आली आहे. यामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत सदर दोन्ही शासन निर्णय अधिक्रमित करुन कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर पुरविण्यात येणाऱ्या सर्वच कृषि औजारे, पीक संरक्षण औजारे, विद्युत / डिझेल /

पेट्रोकेरोसीन पंपसंच, एचडीपीई पाईप, सुक्ष्म अन्नद्रव्ये, जिप्सम, जैविक खते, जंतुनाशके, रासायनिक खते, जैविक जंतुनाशके इत्यादी विविध कृषि निविष्ठांचा पुरवठा करण्याकरीता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ या संस्थेची एकमेव पुरवठादार संस्था म्हणून नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर पुरविण्यात येणाऱ्या सर्वच कृषि औजारे, पीक संरक्षण औजारे, विद्युत / डिझेल / पेट्रोकेरोसीन पंपसंच, एचडीपीई पाईप, सुक्ष्म अन्नद्रव्ये, जिप्सम, जैविक खते, जंतुनाशके, रासायनिक खते, जैविक जंतुनाशके, इत्यादी विविध कृषि निविष्ठांचा पुरवठा करण्याकरीता या आदेशाने महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ या संस्थेची एकमेव पुरवठादार संस्था म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने शासनाच्या प्रचलित धोरणानुसार ई-निविदा मागविणे, व्यापक प्रसिध्दी देऊन दर मागविणे बंधनकारक असून दर निश्चिती करण्यासाठी सभेत आयुक्त (कृषि) यांना निमंत्रित करणे व त्यांनी किंवा त्यांचे संचालकपेक्षा कमी दर्जाचे नसलेले प्रतिनिधी यांना हजर राहणे बंधनकारक राहील. कृषि आयुक्त कार्यालयातील राज्यस्तरीय तांत्रिक समितीने मान्यता दिल्यानंतर अशा दरांना अंतिम मान्यता शासन नियुक्त समिती देईल.

३.विविध योजनांतर्गत शेतकऱ्यांना अनुदानावर पुरविण्यात येणाऱ्या विविध कृषि निविष्ठा शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराने व उच्च गुणवत्तेचीच राहतील याची संपूर्ण जबाबदारी पुरवठादार संस्था म्हणून महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाची राहील. त्याकरीता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने पुरवठापूर्व गुणवत्ता तपासणीसाठी स्वतःची गुणवत्ता नियंत्रण यंत्रणा निर्माण करावी.

४. पुरविण्यात येणाऱ्या विविध कृषि निविष्ठांबाबत विक्रि-पश्चात सेवा-सुविधा पुरविण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाची राहील.

५. शासनाने निश्चित केलेल्या दरापेक्षा जादा दराने अथवा कमी गुणवत्तेच्या निविष्ठांची विक्रि केल्याचे निदर्शनास आल्यास महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाकडून जादा दराची रक्कम वसूल करण्यात येईल.

६. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने सेवा शुल्क ३ टक्के व तपासणी शुल्क ०.६६ टक्के मिळून एकूण ३.६६ टक्के पेक्षा अधिक शुल्क घेतले जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळाकरीता ज्या वस्तु राखून ठेवण्यात आलेल्या आहेत, त्यांचा पुरवठा महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळामार्फत करण्यात येईल.

८. राज्यातील चारही कृषि विद्यापीठांनी त्यांनी उत्पादीत केलेल्या कृषि औजारे व इतर निविष्ठा महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाच्या माध्यमातून विक्रिकरीता उपलब्ध करुन द्याव्यात आणि त्यासंदर्भात आवश्यक ते करार थेट महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ यांचेशी करण्यात यावेत.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०५१५३३३६०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2015.11.05 15:35:11 +05'30'

**श.बा.पावसकर**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे -१
४) कुलगुरू, कृषि विद्यापीठे (सर्व)
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, मुंबई -२५
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र सहकारी पणन महासंघ, मुंबई - ९
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
८) कृषि संचालक (निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
११) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१२) कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

**प्रत**

१) मा. मंत्री (कृषि व पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२) मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३) मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -३२
४) उपसचिव (निविष्ठा व गुण नियंत्रण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -३२
५) सर्व कक्ष अधिकारी / अवर सचिव / उप सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२